**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा गांडोळे, ता.दिंडोरी, जि. नाशिक येथील क्रीडांगण बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआबां-२०१०/प्र.क्र.१८९/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २२ मार्च, २०१०.

<u>**वाचा**</u> :- आयुक्त, आ.वि.,नाशिक यांचे पत्र क्र.शाआशा/क्रिवि/प्र.क्र.३/का.८,दि.३०.१.२०१०.

<u>**शासन निर्णय**</u> : प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक याच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा गांडोळे, ता.दिंडोरी, जि.नाशिक येथील क्रीडांगण बांधकामाचे रु.४,७६,०००/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहे.

२. सदर अंदाजपत्रक संबंधित शाखा अभियंता यांनी तयार केले असून उप विभागीय अभियंता, आदिवासी मार्ग प्रकल्प उपविभाग क्र.३, नाशिक, मुख्याध्यापक, शासकीय पोस्ट बेसिक आश्रमशाळा, गांडोळे व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (उत्तर) विभाग, नाशिक यांनी साक्षांकित केले आहे.

३. सदर अंदाजपत्रक सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित आहे. सदर काम बांधकामाचे असून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक याच्या कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळेच्या क्रीडांगण बांधकामाच्या रु.४,७६,०००/- (रुपये चार लाख श्याहत्तर हजार फक्त) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओ शुटींग करुन त्याची सी.डी.शासनास सादर करण्यात यावी.

५. सदर *बांधकामाचा खर्च उपरोक्त शाळेच्या संरक्षक भित बांधकामाच्या शिल्लक* तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच

मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००३२२२०४२३३००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( गी. मो. चांदे )
अवर सचिव

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (उत्तर) विभाग, नाशिक.
उप अभियंता, आदिवासी मार्ग प्रकल्प उप विभाग क्र.३, नाशिक.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.